**श्री महालक्ष्मी ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप सोसा.लि.,साखरपा,ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी या संस्थेस राष्ट्रीय सहकारी विकास योजनेअंतर्गत रा.स.वि.नि. कर्ज, रा.स.वि.नि. भागभांडवल व शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: प्रक्रिया-१११२/प्र.क्र.११८(भाग-२)/१-स**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.

**दि. ०६ जानेवारी, २०२०.**

**वाचा:-**

१) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: प्रक्रिया-११२००४/प्र.क्र. १६२(अ)/९-स, दि. १२.१०.२००७.

२) शासन परिपत्रक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.प्रक्रिया-११०९/प्र.क्र.१०५/९-स, दि.०९.१०.२०१९.

३) रा.स.वि.नि. नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NCDC:१-६२/२०१२-PC/१०९/SA२००३५, दि.०८.०६.२०१२.

४) शासन निर्णय क्र. प्रक्रिया-११२०१४/प्र.क्र.४६/९-स, दि.०१.०७.२०१४

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.प्रक्रिया-१११२/प्र.क्र.१४०/९-स, दि.०७.०४.२०१५.

६) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं:-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.

७) पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.पणन-२/कृउप्र/महालक्ष्मी ॲग्रो/त्रुटी पुर्तता/२०१९/३१६२, दि.०५.०८.२०१९.

**प्रस्तावना:-**

श्री महालक्ष्मी ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप सोसा.लि.,साखरपा, ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी या संस्थेमार्फत '**काजू प्रक्रिया**' करण्याचा प्रकल्प उभारण्यात येत असून, राज्यातील शेतकऱ्यांनी उत्पादित केलेल्या शेतमालाला योग्य भाव मिळावा म्हणून सहकारी संस्थांना १:९ या प्रमाणात शासकिय भागभांडवल व रा.स.वि.नि. कर्ज देण्याबाबत संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार सदर संस्थेच्या प्रकल्पाची वित्तीय सहाय्यासाठी राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडे शिफारस करण्यात आलेली होती. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने त्यांच्या दि.०८.०६.२०१२ च्या संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये सदर प्रकल्पाच्या किंमत रु.३३८.३० लाख इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यास खालील आकृतीबंधानुसार मान्यता दिलेली आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशिल | टक्केवारी | आर्थिक आकृतिबंध |
|---|---|---|---|
| १ | राज्य शासनाच्या हमीवर रा.स.वि.नि. किंवा इतर वित्तीय संस्थेकडून कर्ज | ६०% | २०२.९८ |
| २ | रा.स.वि.नि. भागभांडवल | ३०% | १०१.४९ |
| ३ | राज्य शासनाचे भागभांडवल | ०६% | २०.३० |
| | **एकूण:-** | **९६%** | **३२४.७७** |
| ४ | संस्थेचे स्वभागभांडवल | ०४% | १३.५३ |
| | **एकूण:-** | **१००%** | **३३८.३०** |

वरील आकृतीबंधानुसार संस्थेने जमा करावयाची आपल्या हिश्याची रक्कम रु.१३.५३ लाख पूर्णपणे जमा केली आहे. संस्थेस वाचा मधील **संदर्भ क्र.४ द्वारे शासन निर्णय दि. ०१.०७.२०१४** अन्वये रा.स.वि.नि. कर्ज रु. ३३.८० लाख, रा.स.वि.नि. भागभांडवल रु.२७.४९ लाख व शासकिय भागभांडवल रु.१०.१५ लाख असे एकूण रु. ७१.४४ लाख इतके अर्थसहाय्य वितरित करण्यात आलेले आहे. सद्यस्थितीस संस्थेस रा.स.वि.नि. कर्ज रु.१६९.१८ लाख, रा.स.वि.नि. भागभांडवल रु.७४.०० लाख व शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) रु.१०.१५ लाख असे एकूण रु.२५३.३३ लाख इतके अर्थसहाय्य वितरित करणे बाकी आहे. त्यानुसार या संस्थेस पुढील अंतिम टप्प्यातील अर्थसहाय्य वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयाद्वारे श्री महालक्ष्मी ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप सोसा.लि.,साखरपा, ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी या संस्थेस उपरोक्त आकृतीबंधात दर्शविण्यात आल्यानुसार **रा.स.वि.नि. कर्जाच्या पुढील हप्त्यापोटी रा.स.वि.नि. कर्ज (६४२५ ०३१३) या लेखाशिर्षखाली रू.१,६९,१८,०००/- (रु. एक कोटी एकोणसत्तर लाख अठरा हजार फक्त), रा.स.वि.नि. भागभांडवल (४४२५ ०२९४) या लेखाशिर्षखाली रू.७४,००,०००/- (रु. चौऱ्याहत्तर लाख फक्त) व शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) (४४२५ ०७५९) या लेखाशिर्षखाली रू. १०,१५,०००/- (रु. दहा लाख पंधरा हजार फक्त)** असे एकूण **रु.२,५३,३३,०००/- (रु. दोन कोटी त्रेपन्न लाख तेहत्तीस हजार फक्त)** वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

०२. कर्जाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या दि.०८.०६.२०१२ रोजीच्या मंजूरी आदेशाप्रमाणे राहतील. शासकिय भागभांडवलाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती शासन निर्णय दि.१२.१०.२००७ व संदर्भ क्र.२ येथील दि.०९.१०.२००९ च्या परिपत्रकातील तरतूदीनुसार राहतील. तसेच संस्थेस आतापर्यंत मंजूर झालेल्या रकमेएवढया किंमतीच्या संस्थेची मालमत्ता तारण ठेवण्याची व त्या मालमत्तेवर शासनाचा बोजा चढविणे तसेच, आता **संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या रक्कमेच्या २० टक्के इतक्या रक्कमेची संचालकाकडून वैयक्तिक मालमत्तेचा तारण गहाण लिहून घेणे बंधनकारक राहिल. सदर प्रकल्पाची उभारणी झाल्यानंतर (१ वर्षाच्या आत) व संस्थेकडून उत्पादन सुरु झाल्यानंतर लगेचच शासनाचे अर्थसहाय्याची परतफेड विहीत कालमर्यादेत नियमितपणे करण्यात येईल. याबाबतचे हमीपत्र संस्थेकडून स्टॅम्प पेपरवर आवश्यक त्या उचित प्राधिकाऱ्यामार्फत AFFIRM व SWEAR करुन घेण्यात यावे. त्याशिवाय सदर मंजूर अर्थसहाय्य वितरित करण्यात येऊ नये.**

०३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या उक्त रकमांचे आहरण करुन वरील परिच्छेद ०२ मधील अटींची पूर्तता करुन श्री महालक्ष्मी ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप सोसा.लि.,साखरपा, ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी या संस्थेला अर्थसहाय्य वितरित करण्याकरिता लेखाधिकारी, पणन संचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या स्वतंत्र लेखाशीर्षाखालील रकमा जिल्हा कोषागार अधिकार, पुणे येथून आहरित करुन संस्थेस वितरित करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांनी करावी. त्यास अनुसरुन **रा.स.वि.नि. कर्ज (६४२५ ०३१३) या लेखाशिर्षखाली रू.१,६९,१८,०००/- (रु. एक कोटी एकोणसत्तर लाख अठरा हजार फक्त), रा.स.वि.नि. भागभांडवल (४४२५ ०२९४) या लेखाशिर्षखाली रू.७४,००,०००/- (रु. चौऱ्याहत्तर लाख फक्त) व शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) (४४२५ ०७५९) या लेखाशिर्षखाली रू. १०,१५,०००/- (रु. दहा लाख पंधरा हजार फक्त)** असे एकूण **रु.२,५३,३३,०००/- (रु. दोन कोटी त्रेपन्न लाख तेहत्तीस हजार फक्त)** इतक्या रकमांचे स्वतंत्र धनादेश ,

**"श्री महालक्ष्मी ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप सोसा.लि.,साखरपा, ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी"**

"SHRI MAHALAXMI AGRO PROCESSING CO-OP SOCIETY LTD.,SAKHARPA, TALUKA SANGMESHWAR, DISTRICT RATNAGIRI."

च्या नांवाने वितरित करण्यात यावा.

०४. कर्जाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या दि.०८.०६.२०१२ रोजीच्या मंजूरी आदेशाप्रमाणे तसेच, दि.१२.१०.२००७ च्या शासन निर्णयानुसार, दि.०९.१०.२०१९ च्या परिपत्रकानुसार व वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन परिपत्रक व मार्गदर्शक सूचनांनुसार राहतील. शासकिय भागभांडवलाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती शासन निर्णय दि.१२.१०.२००७ नुसार व दि.०९.१०.२०१९ च्या परिपत्रकानुसार राहतील. **संस्थेला निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर सदर निधीचा विनियोग तात्काळ होऊन संस्था उत्पादनाखाली येईल व त्यांच्याकडून कर्ज / भागभांडवलाची परतफेड एक वर्षाच्या आत सुरु होईल, याची जबाबदारी संबंधीत जिल्हा उपनिबंधक व सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे यांची राहील.**

०५. वरीलप्रमाणे मंजूर केलेला खर्च

**अ)** रा.स.वि.नि. कर्ज (६४२५ ०३१३) या लेखाशिर्षखाली **रू.१,६९,१८,०००/- (रु. एक कोटी एकोणसत्तर लाख अठरा हजार फक्त)** चा खर्च "मागणी क्र. व्ही.-५,६४२५- सहकारासाठी कर्जे, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०२) सहकारी प्रक्रिया संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०२)(०१) (६४२५०३१३) ५५- कर्जे व आगाउ रकमा" या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानातून सहकारी शेतीमाल संस्थांना कर्जे (राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ) भागविण्यात यावा.

**ब)** रा.स.वि. नि. भागभांडवल (४४२५ ०२९४) या लेखाशिर्षाखाली **रू.७४,००,०००/- (रु. चौऱ्याहत्तर लाख फक्त)** चा खर्च "मागणी क्र. व्ही.-३,४४२५- सहकारावरील भांडवली खर्च, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका, (०२) सहकारी संस्करण संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत- योजना, राज्य योजनांतर्गत योजना (००)(०२) कृषि संस्करण संस्थेला (राष्ट्रीय सहकार विकास महामंडळ) (४४२५ ०२९४)-३२- अंशदाने" या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**क)** शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) (४४२५ ०७५९) या लेखाशिर्षाखाली **रू. १०,१५,०००/- (रु.दहा लाख पंधरा हजार फक्त)** चा खर्च "मागणी क्र. व्ही.-३,४४२५- सहकारावरील भांडवली खर्च, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका, (०२) सहकारी संस्करण संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत- योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२)(०८) कृषि प्रक्रिया संस्थांना भागभांडवली अंशदान संस्थेला (कोल्हे कमिटी) (राज्य योजना) (४४२५ ०७५९)-३२- अंशदाने" या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०६. सदरच्या रकमेचा विनियोग संस्था आवश्यक त्याच बाबींकरिता करीत आहे, याबाबतचे नियंत्रण पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, रत्नागिरी यांनी संस्थेच्या कामकाजावर आणि विहीत वेळेत प्रकल्प उभारणी करण्यात येत आहे, यावर लक्ष ठेवावयाचे आहे. संस्थेच्या कामाच्या प्रगतीचा तिमाही अहवाल जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, रत्नागिरी यांनी पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावा. पणन संचालक यांनी सदर अहवाल तपासून परस्पर राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली व क्षेत्रीय कार्यालय, पुणे यांना न चुकता दर तीन महिन्यानंतर सादर करावा. व त्याची प्रत शासनास पाठवावी. जेणेकरुन निगमाकडून शासनास रक्कमेची प्रतिपूर्ती

लवकरात लवकर होऊ शकेल. जर या कामी संस्थेकडून कुचराई झाल्यास एकरकमी अर्थसहाय्याची रक्कम वसूल करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील.

०७. संस्थेस यापूर्वी देण्यात आलेल्या अर्थसहाय्यातून संस्थेने प्रकल्प उभारणीच्या अनुषंगाने केलेले बांधकाम व इतर कामे अर्धवट असल्यास, आता मंजूर करण्यात येत असलेल्या अर्थसहाय्यातून ६ महिन्यांच्या आत पूर्ण करावीत व प्रकल्प कार्यान्वित करावा. शासन निर्णय दि.१२.१०.२००७ तरतूदीनुसार प्रकल्प कार्यान्वित होऊन उत्पादनाखाली आल्यानंतर ६ महिन्यांनी शासनाने दिलेल्या अर्थसहाय्याची तिमाही वसुली संबंधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था व सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे यांनी सुरु करावी. याची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहील. वसुलीचा वार्षिक अहवाल शासनास सादर करावा. या अटीच्या अधीन सदर अर्थसहाय्य वितरित करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार वेळेचे बंधन पाळण्यात यावे. त्याची जबाबदारी जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, रत्नागिरी व सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे यांची राहील व सदर कामावरील नियंत्रण पणन संचालकांचे राहील. सदर संस्थेचा प्रकल्प वैधता कालावधी दि.३१.०३.२०२० रोजी समाप्त होत आहे. त्यामुळे, सदर विहित मुदतीत प्रकल्प पूर्ण करण्याबाबत संस्थेने योग्य ती काळजी घ्यावी. वरील सर्व अटीची पूर्तता झाली किंवा नाही याची खात्री पणन संचालक यांनी केल्यानंतर निधी वितरित करण्यात यावा.

०८. या प्रकल्प खर्चामध्ये वाढ झाल्यास सदर वाढीव किंमत संस्थेने स्वबळावर उभी करावयाची आहे. वाढीव प्रकल्प किंमतीमध्ये शासनाच्या कोणताही अर्थसहाय्याचा सहभाग असणार नाही, याची संस्थेने नोंद घ्यावी.

०९. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, नियम १४८ व १५३ अन्वये शासनाने दिलेली कर्जे व त्यावरील व्याजाची वेळचेवेळी वसुली नियमितपणे केली जात आहे व त्या सरकारी लेख्यात यथोचितरित्या जमा केल्या जात आहेत. यावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय सहसंचालक या नियंत्रक अधिकाऱ्याची आहे. तसेच, दिलेल्या कर्जासंबंधीचे अभिलेख संकलित करणे, लेखे अद्यावत ठेवणे आणि त्या संदर्भातील इतर आवश्यक कार्यवाही करणे ही जबाबदारी देखील संबंधित नियंत्रक अधिकाऱ्याची आहे. या संदर्भातील सूचना वित्त विभागामार्फत यापूर्वीच देण्यात आल्या आहेत.

१०. हे आदेश वित्त विभागाचे वाचामधील क्रमांक ६ मध्ये उल्लेख केलेल्या शासन परिपत्रकाद्वारे प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार तसेच अनौपचारीक संदर्भ क्र.४८३/२०१९/व्यय-२, दि.१९.११.२०१९ अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१०६१६५९५४६२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jaiprakash
Mansaramji Ambade

Digitally signed by Jaiprakash Mansaramji Ambade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperative Marketing, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ce079d77649e3080d74540a4a9ae7f6502ac7e6273891f24ffda6ebea493dce, serialNumber=d214bfebdf948d521ecc91e9cb1487d0cce508098bc2232154c36daba7635819, cn=Jaiprakash Mansaramji Ambade
Date: 2020.01.06 16:46:50 +05'30'

**( ज.म. अंबादे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव
३. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.

४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
६. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०. व्यवस्थापकिय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ४, सिरी इन्स्टिटयुशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली- ११००१६.
११. प्रादेशिक संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५, बी.जे.रोड, पुणे-१.
१२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्या.१४३१) मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/(अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई.
१६. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, रत्नागिरी.
१७. लेखाधिकारी, पणन संचालनालय, म.रा. पुणे-१.
१८. कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९. कार्यासन अधिकारी (९-स), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०. अध्यक्ष, “श्री महालक्ष्मी ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप सोसा.लि.,साखरपा, ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी”
२१. निवडनस्ती (१-स).

*************************